**शालेय स्तरावर पर्यावरण सेवा योजना**
**राबविण्यासाठी निधी मुक्त करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पर्यावरण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पसेयो २०१९/प्र क्र २९७/तां.क.१

नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १० जानेवारी, २०२०.

**वाचा -**

१. **या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१०/प्र क्र ८/तां.क.३, दिनांक १४ जानेवारी,२०११,दिनांक २४ जून,२०११, व दिनांक २७ मार्च, २०१२.**
२. **या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१४/प्रक्र९३/तां.क.१, दिनांक १२ सप्टेंबर,२०१८.**
३. **कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांचे पत्र क्रमांक-सीईई/केंद्र/ ईएसएस-८६६८६६/२०१८-१९,Date-१० डिसेंबर,२०१८.**
४. **या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१४/प्रक्र९३/तां.क.१,दिनांक ११ मार्च,२०१९.**
५. **वरिष्ठ कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांचे पत्र क्र. सीईई/सेन्ट./इ.एस.एस.- ९२६/२०१९-२०,दिनांक २५ जुलै,२०१९.**
६. **प्रधान सचिव पर्यावरण विभाग यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १९ ऑगस्ट,२०१९ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.**
७. **वरिष्ठ कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांचे पत्र क्र. सीईई/सेन्ट./इ.एस.एस.- ९४४/२०१९-२०,दिनांक १६ सप्टेंबर,२०१९.**

**प्रस्तावना -**

"पर्यावरण संवर्धन व संरक्षण यांचे महत्व शालेय स्तरावर बालवयात विद्यार्थ्यांमध्ये प्रत्यक्ष कृतिद्वारे बिंबवून "पर्यावरण संवेदनशील व सजग" भावी पिढी निर्माण करण्याच्या उद्देशाने पर्यावरण विभागामार्फत महाराष्ट्र राज्यातील माध्यमिक शाळांमध्ये "पर्यावरण सेवा योजना" [Environment Service Scheme (ESS)] ही सन २०११ पासून सुरु करण्यात आली. सदर योजनेच्या पहिल्या टप्प्यात राज्यातील १२ जिल्हयांमधील ५० शाळांचा समावेश आहे. सदर याजनेची पर्यावरण विभागाच्या वतीने राज्यस्तरावर अंमलबजावणी केंद्रिय पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे (Centre for Environment Education (CEE, Pune) यांचे मार्फत करण्यात येत आहे. या अनुषंगाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपरोक्त कार्यक्रम राबविण्यासाठी पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे यांच्याकडून संदर्भाधिन क्र. ५ व क्र. ७ अन्वये पर्यावरण विभागास एकूण १,२८,८९,४३५/- एवढया खर्चाचे अंदाजपत्रक प्राप्त झालेले आहे. सदर योजनेच्या अनुषंगाने प्रधान सचिव (पर्यावरण) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १९ ऑगस्ट,२०१९ रोजी आढावा बैठक पार पडली असून, सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" (Centre for Environment Education (CEE),

Pune) यांचे मार्फत रुपये १,२८,८९,४३५/- इतक्या खर्चास तसेच पर्यावरण शिक्षण केंद्र यांना सदर रक्कमेपैकी ६०% रक्कम रु. ७७,३३,६६१/- वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

शालेय स्तरावर पर्यावरण कार्यक्रम राबविण्यासाठी “पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे” यांना त्यांच्याकडून प्रस्तावित केलेल्या अंदाजपत्रकानुसार पर्यावरण सेवा योजना राज्यातील ५० शाळांमध्ये राबविण्यासाठी रु. १,२८,८९,४३५/- (एकूण रुपये एक कोटी अठ्ठावीस लाख एकोण्ण नव्वद  हजार चारशे पस्तीस फक्त) एवढी रक्कम मंजूर करण्यास व सदर रक्कमेपैकी ६० टक्के  पहिला हप्ता म्हणून रु. ७७,३३,६६१/- मुक्त करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. उपरोक्त मुक्त करण्यात आलेली रक्कम ही शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१०/ प्र क्र.८/तां.क.३, दिनांक १४ जानेवारी,२०११ मध्ये नमूद सर्व अटींच्या  अधिन राहून  करण्यात येत आहे.

२. हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे.  त्याच प्रयोजनासाठी खर्च करावे.  योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा  केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्तीप्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे, ही रक्कम इतर दुसऱ्या कोणत्याही कामासाठी वापरता येणार नाही किंवा   वळती करता येणार नाही.

३. पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे  यांनी प्रत्येक आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिल महिन्याच्या १५ तारखेपर्यंत पर्यावरण  विभागास सादर करावे.  उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी वा खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणाऱ्या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.  सहायक अनुदानामधून करण्यात येणांऱ्या खर्चाच्या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावे व त्याचे लेखापरिक्षण करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.

२. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून “पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे” यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. मनोहर बंदपट्टे, अवर सचिव (आस्थापना), पर्यावरण विभाग व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. सु.कि.निकम,  उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात येत आहे.  त्यांनी “पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे” (Centre for Environment Education, Pune)यांना रु. ७७,३३,६६१/- (एकूण रुपये सत्याहत्तर लाख  तेहतीस हजार सहाशे एकष्ठ फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. यु-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना(०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५ १३०२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली  खर्ची  घालावा

व तो सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपरोक्त कार्यक्रमासाठी एकूण रु.५००.०० लक्ष एवढी तरतूद मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र क्र ९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ मधील परिच्छेद क्र.४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र क्र ९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ मधील परि. क्र. ७ ते ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

५. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक अर्थसं २०१९/प्र क्र ९२/अर्थ-३, दिनांक ०८ जुलै, २०१९ सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ अन्वये खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) यो जनेस प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे.

२) "पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे" (Centre for Environment Education. Pune) यांना पहिला हप्ता रु. ७७,३३,६६१/- (एकूण रुपये सत्याहत्तर लाख तेहतीस हजार सहाशे एकष्ठ फक्त) इतका निधी मुक्त करण्यास प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

३) यापूर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले आहे. तसेच मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४) मागणी क्रमांक-क्र.यु-४,३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२)(१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५ १३०२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) तसेच परिच्छेदातील ४,५,६,७,८,१० या बाबी लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११३१७११०२२९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Ramchandra Bandpatte

Digitally signed by Manohar Ramchandra Bandpatte
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Environment Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb60e1f4b73938805c04b06f5c0907864cb639223a53ce540f9ce8e8e6593e5d, serialNumber=bb7b9a28cd6d8e2b1fa8f60d210258464e6ece204d02617fbb7ed6be3db6752c, cn=Manohar Ramchandra Bandpatte
Date: 2020.01.13 16:51:19 +05'30'

**( मनोहर बंदपट्टे )**

अवर सचिव, पर्यावरण विभाग महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२. मा. राज्यमंत्री (पर्यावरण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई-३२.

४. कार्यक्रम संचालक, पर्यावरण शिक्षण केंद्र, पुणे

५. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.

८. निवासी लेखा अधिकारी,मुंबई.

९. वित्त विभाग, कार्यासन (व्यय-१६),मंत्रालय मुंबई-३२.

१०. पर्यावरण विभागातील सर्व कार्यासने,

११. रोख शाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. ( ३ प्रती)

१२. निवड नस्ती (तां.क.१)